उप विभागीय अभियंता (स्थापत्य), गट-अ
पदोन्नती रद्द करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१७/सेवा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : ३० /०६/२०२३

**वाचा -**

१) शासन आदेश क्रमांक- पीओजी-२०२०/प्र.क्र.२७४/सेवा-२ दिनांक- ०७/१०/२०२१
२) शासन ज्ञापन, समक्रमांक, दि. २५/०४/२०२३

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ०७/१०/२०२१ च्या आदेशान्वये श्री.मोहिद्दीन चाँदसाहेब शिकलगार यांना सहायक अभियंता श्रेणी-२(स्थापत्य) संवर्गातून उप विभागीय अभियंता (स्थापत्य) पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येऊन त्यांची पदोन्नती उपरांत पदस्थापना उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई येथे करण्यात आलेली आहे.

२. श्री.शिकलगार हे उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई या पदोन्नतीच्या पदावर रूजू झाले नसल्यामुळे त्यांना पदोन्नतीच्या पदावर सात दिवसाच्या आत हजर होण्याबाबत तसेच सात दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावर हजर न झाल्यास त्यांचे पदोन्नतीचे आदेश रद्द करण्यात येतील, असे संदर्भ क्र.२ येथे नमूद शासन ज्ञापन दि.२५/०४/२०२३ अन्वये कळविण्यात आले होते. सदर नोटीशीस अनुसरुन श्री.शिकलगार हे पदोन्नतीच्या पदावर रुजू झालेले नाहीत अथवा त्यांनी कोणतेही निवेदन सादर केलेले नाही. त्यामुळे श्री.शिकलगार यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नसल्याचे स्पष्ट होत असल्याने त्यांना दिनांक ७.१०.२०२१ च्या आदेशान्वये उप विभागीय अभियंता (स्थापत्य) पदावर देण्यात आलेली पदोन्नती सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने रद्द करण्यात येत आहे. श्री.शिकलगार यांचे सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावरील पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०२३०६३०१९३२४५९११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, pseudonym=F9345CFD89BE8F3E65EF0E9FCEBB01B03D01EB11, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2023.06.30 19:44:38 +05'30'

**(पुजा भा.उदावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
३. अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
४. अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर
५. सहसिचव(आस्था)/सहसचिव(सं.नि.), सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई
६. श्री.मोहिद्दीन चाँदसाहेब शिकलगार, सहायक अभियंता श्रेणी-२ यांना संबंधीत मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग यांचेमार्फत
७. मा.मंत्री (सा.बां) (सा.उ.वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव(रस्ते) /सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कार्यासन आस्था-१ / आस्था-३/ सेवा-३/प्रशा-२, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
११. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.